धारावी अधिसूचित क्षेत्रांतर्गत धारावी पुनर्विकास प्रकल्पाच्या अंमलबजावणीकरिता स्थापन करण्यात आलेल्या विशेष हेतू कंपनी (SPV) साठी संचालकाची नियुक्ती करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - धापुप्र-२०२३/प्र.क्र. १२०/झोपसु**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ७ जून,२०२४

<u>वाचा :-</u> (१) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्रमांक: झोपुयो २००३/प्र.क्र.१८९/ झोपसु-१अ, दि.४ फेब्रुवारी, २००४

(२) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्रमांक - धापुप्र-२०१८/प्र.क्र. ९०/झोपसु, दि. ०५ नोव्हेंबर, २०१८

(३) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्रमांक - धापुप्र-२०२२/प्र.क्र. ८७/झोपसु, दि. २८ सप्टेंबर, २०२२.

(४) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग समक्रमांक दिनांक ०८ जानेवारी,२०२४

<u>प्रस्तावना</u> :- दिनांक ०५.११.२०१८ व दिनांक २८.०९.२०२२ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार धारावी अधिसूचित क्षेत्रांतर्गत धारावी पुनर्विकास प्रकल्पाच्या अंमलबजावणीकरिता विशेष हेतू कंपनी (SPV) ची स्थापना करण्यात आली. मुख्य कार्यकारी अधिकारी तथा विशेष कार्य अधिकारी, धापुप्रा, मुंबई यांनी विशेष हेतू कंपनीच्या संचा़लक मंडळावर शासन नामनिर्देशित दोन संचालक व संचालक मंडळाचे अकार्यकारी अध्यक्ष यांची नियुक्ती करण्याची विनंती केली होती. त्यानुषंगाने गृहनिर्माण विभागाच्या संदर्भाधीन दिनांक ०८ जानेवारी, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये शासन नामनिर्देशित संचालक म्हणून अपर मुख्य सचिव (गृहनिर्माण) व मुख्य कार्यकारी अधिकारी तथा विशेष कार्य अधिकारी, धारावी पुनर्विकास प्रकल्प यांची नियुक्ती करण्यात आलेली होती. सदरहू शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे.

झोपडपट्टी अधिनियम (सुधारणा, निर्मूलन व पुनर्विकास) १९७१ च्या कलम ३५ अंतर्गत दिनांक ०८ मार्च, २०१७ रोजीच्या महाराष्ट्र शासन राजपत्रान्वये शिखर तक्रार निवारण समिती (AGRC), मुंबई ची स्थापना करण्यात आलेली आहे. या समिती समोर मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपुप्रा,मुंबई व मुख्य कार्यकारी अधिकारी तथा विशेष कार्य अधिकारी, धापुप्रा, मुंबई यांनी तसेच त्यांनी प्राधिकृत केलेल्या इतर अधिकाऱ्यांनी पारित केलेल्या आदेशांविरुद्धची अपिले दाखल करण्यात येतात. त्यामुळे मुख्य कार्यकारी अधिकारी, धापुप्रा, मुंबई यांनी कलम ३३ व कलम ३८ अंतर्गत दिलेल्या नोटीसांविरोधात झोपडीधारकांद्वारे शिखर तक्रार निवारण समिती (AGRC) समोर अपीले दाखल करण्यात येतात. या शिखर तक्रार निवारण (AGRC) समितीचे अध्यक्ष हे अपर मुख्य सचिव (गृहनिर्माण) आहेत.

AGRC चे अध्यक्ष, धापुप्रा, प्रा. लि. कंपनीच्या संचालक मंडळावर संचालक तसेच गृहनिर्माण विभागाचे अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण म्हणुन कार्यरत असल्याने तेथे "Conflict of Interest" निर्माण होईल. तसेच मुख्य कार्यकारी अधिकारी, धापुप्रा,मुंबई यांनी तसेच त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यांनी पारित केलेल्या आदेशाविरुद्ध भविष्यात होणाऱ्या अपिलांमध्ये अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण यांच्या अध्यक्षतेखाली AGRC समोर सुनावणी घेणे "Principle of Natural Justice"च्या विरुद्ध ठरेल. त्यामुळे धारावी पुनर्विकास प्रकल्प प्रा. लि. कपंनीवर त्यांनी संचालक म्हणून असणे संयुक्तिक ठरणार नाही. तसेच अपर मुख्य सचिव (गृहनिर्माण) या नात्याने धारावी पुनर्विकास प्रकल्पासंदर्भातील कामकाज त्यांच्या देखरेखीखालीच पार पाडले जाते. उपरोक्त बाबींचा विचार करता, DRPPL कंपनीच्या संचालक मंडळावर अपर मुख्य सचिव (गृहनिर्माण) यांची झालेली नियुक्ती रद्द करुन त्याऐवजी धारावी पुनर्विकास प्रकल्पाच्या अंमलबजावणी तथा त्यासंबंधी आवश्यक कामकाज पाहण्याकरिता आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका या क्षेत्रिय कार्यालयातील अधिकाऱ्याची DRPPL या कंपनीमध्ये शासन नामनिर्देशित संचालक म्हणून नेमणूक करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>** धारावी पुनर्विकास प्रकल्पाच्या अंमलबजावणीकरिता स्थापन करण्यात येत असलेल्या विशेष हेतू कंपनीच्या संचालक मंडळावर शासन नामनिर्देशित संचालक म्हणून मुख्य कार्यकारी अधिकारी तथा विशेष कार्य अधिकारी, धारावी पुनर्विकास प्रकल्प,मुंबई व आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई यांची नियुक्ती करण्यात येत आहे. तसेच संचालक मंडळाचे अकार्यकारी अध्यक्ष म्हणून मुख्य कार्यकारी अधिकारी तथा विशेष कार्य अधिकारी, धारावी पुनर्विकास प्रकल्प यांची नियुक्ती करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०६०७१४४६२७३००९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL BABURAO TUMBARE

Digitally signed by SUNIL BABURAO TUMBARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT, 2.5.4.20=6db48f86ab804a2f08a49a53d5dddd92f7dca38c78a21ad05da451e33813593c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4E35B68528305D98FA8F8D62D295D490751E30D94B9E433CB0CC3714A0098215, cn=SUNIL BABURAO TUMBARE
Date: 2024.06.07 14:59:42 +05'30'

**( सु.बा.तुंबारे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव व सचिव
३. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे अपर मुख्य सचिव व सचिव
४. मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे अपर मुख्य सचिव व सचिव
५. मा. मंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव

६. मा. सभापती, विधान परिषद/मा. अध्यक्ष, विधानसभा
७. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा
८. मा. सर्व विधानसभा आणि विधान परिषद सदस्य
९. मा. मुख्य सचिवांचे सह सचिव
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र२-, नागपूर.
१२. मा. महाअधिवक्ता, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई.
१३. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव.
१४. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
१५. मुंबई महानगर प्रदेश क्षेत्रातील सर्व महानगरपालिका आयुक्त,
१६. महानगर आयुक्त, मुंबई महानगर व प्रदेश विकास प्राधिकरण, वांद्रे (पूर्व), मुंबई
१७. उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पुर्व),मुंबई -५१
१८. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण,मुंबई.
१९. मुख्य कार्यकारी अधिकारी तथा विशेष कार्य अधिकारी, धारावी पुनर्विकास प्रकल्प, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१
२०. जिल्हाधिकारी, मुंबई शहर/मुंबई उपनगरे जिल्हा
२१. अपर जिल्हाधिकारी (अति/निष्का) मुंबई शहर/पश्चिम उपनगर/पूर्व उपनगरे
२२. मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व)मुंबई / झो. प. सु. मंडळ / मु.इ.दु.व पु. मंडळ .
२३. गृहनिर्माण विभागातील सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी.
२४. सर्व कार्यासने गृहनिर्माण विभाग
२५. निवड नस्ती (झोपसु).